**पु.ल. देशपांडे, महाराष्ट्र कला, अकादमी, मुंबई यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२४ पासून दिनांक ३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय,क्रमांक: पुलदे - २०२४/ प्र.क्र.४७/सांका.२**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०४ मार्च, २०२४.

**संदर्भ :** १. समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग क्र. संकीर्ण-२००१/प्र.क्र. २९८/सां.का.१, दि. २३.०३.२००६.
२. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्र. पुलदे - २०१४/ प्र.क्र.१६३/सांका.२, दि.११.०३.२०१५.
३. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्र. पुलदे-२०२३/प्र.क्र.१७९/सांका.२, दि.१३.०९.२०२३.
४. वित्त विभाग,शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि.२१.०२.२०२४.
५. संचालक, पु.ल.देशपांडे, महाराष्ट्र कला अकादमी यांचे पत्र क्र. पुलदे १७८, दि.२१.०२.२०२४.

**प्रस्तावना:**

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमीच्या १६ पदांच्या सुधारीत आकृतीबंधास संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तर संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये ९ पदे कायम करण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे. पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमीतील अस्थायी पदे दि.०१.०९.२०२३ ते दि.२९.०२.२०२४ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयानुसार मंजूरी देण्यात आली होती. आता सदरची मुदतवाढ संपुष्टात आली आहे व वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयानुसार वित्त विभागाने अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२४ पासून दि.३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत प्रशासकीय विभागास अधिकार प्रदान केले आहेत. त्यानुसार संचालक, पु.ल.देशपांडे, महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांनी संदर्भ क्र. ५ येथील पत्रान्वये, त्यांच्या आस्थापनेवरील ५ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत शासन मान्यतेस्तव प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमीतील ५ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

पु.ल.देशपांडे, महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांचेकडून प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील तक्त्यात नमूद केलेल्या ०५ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२४ पासून दि.३१.०८.२०२४ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | पदनाम व गट | वेतनस्तर | अस्थायी पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | वित्तीय सल्लागार, गट-अ | S-२३ रु. ६७७००-२०८७०० | १ |
| २ | लेखा अधिकारी, गट-ब | S-१६ रु. ४४९००-१४२४०० | १ |
| ३ | निम्नश्रेणी लघुलेखक, गट-क | S-१४ रु. ३८६००-१२२८०० | १ |
| ४ | भांडारपाल, गट-क | S-७ रु. २१७००-६९१०० | १ |
| ५ | रोखपाल, गट-क | S-६ रु. १९९००-६३२०० | १ |
| **एकूण** | | | **०५** |

०२. या शासन निर्णयान्वये उपरोक्त ०५ अस्थायी पदे दि.०१.०३.२०२४ पासून दि.३१.०८.२०२४ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास पुढील अटींच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

१. ज्या प्रयोजनार्थ ही पदे निर्माण केली आहेत त्याच प्रयोजनार्थ त्या पदाचा विनियोग करण्यात यावा.

२. या पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त राहणार नाही.

३. या पदांवरील अपेक्षित खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

०३. याबाबतचा खर्च "मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, (००१) ललीत कला शिक्षण, (०७) (०१) पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी (२२०५ १४६३)-०१ वेतन" या लेखाशिर्षाखाली त्या त्या आर्थिक वर्षात मंजूर आर्थिक तरतूदीतून भागविण्यात येईल.

०४. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१.०२.२०२४ अन्वये प्रशासकीय विभागाला प्रदान केलल्या अधिकारानूसार निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२४०३०५१०४४४८४१२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2024.03.05 13:10:55 +05'30'

**( नंदा राऊत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. संचालक, पु.ल.देशपांडे, महाराष्ट्र कला अकादमी, प्रभादेवी,मुंबई.
२. महालेखापाल महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
५. सह सचिव (व्यय-१५, अर्थ-११),वित्त विभाग , मंत्रालय,मुंबई.
६. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७. निवड नस्ती सां.का.२.